

अंक पहिला १४ नोव्हेंबर ०९

# बाल

संपादक

आसावरी ताई

पीयुष दादा

सजावट

आनंदा





**काय आहे बालनेटाक्षरी ?**

दोस्तांनो हाऽऽय, १४ नोव्हेंबर काय आहे माहीत आहे ? बालदिन. खरंतर हा तुमचाच दिवस नाही का ? याच निमीत्ताने बालनेटाक्षरीचा अंक गिफ़्ट म्हणून घेऊन आलोय. दर महिन्याला तुम्हाला हे गिफ़्ट देणार आहोत. यातून आपली मस्त मैत्री होईल भांडण तर अजिबात होणार नाही गेम खेळताना आई बाबा ओरडतात तसे हा अंक वाचताना कोणी तुम्हास ओरडणारही नाहीत. मग आपली चांगली गट्टी जमेल हो ना ?

आम्हाला माहीत आहे तुम्हाला गोष्टी खूप आवडतात कारण शाळेत कधी कधी सांगाव्या लागतात ना ? त्यासाठी काही गोष्टींचा खजिना आम्ही येथे उघडणार आहोत तर **भरारी** मध्ये तुम्हाला भाषांतरीत गोष्टी वाचायला मिळणार आहेत. शाळेत बाईंनी कधी दांडी मारली तर गप्पा गाणी गोष्टींचा तास सुरु होतो. पण आपल्याला तर काहीच येत नसतं बुआ! **कवितेचा तास** या सदराखाली काही कविता इथे आहेतच. एवढेच नाहीतर कविचे नाव आणि कवितेचा अर्थही येथे देण्यात येणार असल्याने तुम्हाला एकदम सोप्पयं, तर चित्रकलेतील वेगवेगळ्या प्रकारांची माहीतीही आम्ही तुम्हाला **फ़्रेम** या सदरातून करून देणार आहोत, आणि हो झाडं प्राणी पक्षी नद्या यांचीही माहीती तुम्हाला **आभाळाखाली** यात वाचायला मिळणार आहे. थंडीत जसं उबदार पांघरून घेऊन झोप काढावी वाटते तसेच पावसात भिजायला ही तुम्हाला आवडतं ना? असेच भिजत भिजत आपण महाराष्ट्राची सैर करणार आहोत **चला भटकायला** मधून. या अंकातील **शेजारी शेजारी** सदर तर तुम्ही आवर्जून वाचणार आहात कारण यात तुम्हाला ज्युनियर ते सिनियर अशा सर्वच व्यक्ती भेटणार आहेत. आता हे सगळं वाचतानाच भूक तर लागणारच नाही का? मग उघडा आपला **खाऊचा डबा** बघा काही इन्स्टंट खाऊ तयार करता येतोय का. अरे हो मोठ्या गोष्टी वाचताना आपण काही छोट्या गोष्टी विसरतोच नाही का ?यात तुम्हाला छोटीशी गोष्ट **'मधली सुट्टी'** या सदरात वाचायला मिळणार आहे. तर **कच्चा लिंबू** मध्ये तुम्ही जोक्स वाचून नंतर आपल्या मित्रांना सांगायचे आहेत. तुमचे काही मित्र विविध क्षेत्रात उत्तुंग झेप घेत असतात मग त्यांचे कौतुक करायला हवे ना? त्यासाठी **'दिवस आमचा'** यात तुम्ही त्यांच्या बातम्या वाचून त्यांचे कौतूक करू शकता. आता तुम्ही म्हणाल हे सगळं कशासाठी? तर आपल्याला नेहमी **'शेवटचा बेंच'** रहायचंय का? आता आपण पहिल्या बाकावर बसणार आहोत शाळेतला अभ्यास आणि विश्व संचार करण्यासाठी आपला बालनेटाक्षरीचा अंक तुमच्या हातात असणार आहे. हा अंक तुम्ही तुमच्या इतर मित्रांनाही देणार आहात याची मला खात्री आहे. तेंव्हा तयार व्हा पहिल्या बाकावरच्या मित्राशेजारी जाऊन बसायला.

# कहाणी निंबाची



आटपाट नगर होतं. तिथं एक - नाही ब्राह्मण नाही, तर एक निम्ब होता. चांगला सधन कुलामधला. हिरवीगार भरगच्च पानं होती. आला- गेला त्याच्या सावलीला आवर्जून बसायचा. त्याच्या सावलीचं कौतुक करायचा. हाही प्रेमानी फांद्या हलवून येणा-या वाटसरूला वारं घालायचा.त्याची पानंही चांगली गोड होती. ती पानं देऊन, सावली, वारा देऊन हां नेहमी इतरांच्या उपयोगी पडायचा.

मात्र आटपाट नगरातल्या सधन ब्राह्मणाला असतं, तसंच यालाही एक दुःख होतं. याला फूलच येत नसे. फूल नाही, तर फळ कुठून येणार? आणि फळ नसेल, तर पक्षी कसे येणार? सगळे आजुबाजुचे पक्षी येउन याच्या काड्या, पानं जमा करत. पण यावर घरट मात्र बांधत नसत. त्याला फार वाईट वाटे... इतकी काटेरी बाभूळ- पण तिलाही मऊ मऊ पिवळी फुलं येतात!

मग त्यानं तप करायला सुरुवात केली. खाणे पिणे सोडल - तशी त्याची नेहमीची प्रसन्न हिरवी गार पानं पिवळी पडू लागली. वाटसरू त्याला बघून खंतावु लागले- म्हणु लागले की हा झुरतोय.

शेवटी त्याला देव प्रसन्न झाला. तो निम्बाला म्हणाला, "कुठलाही वर माग". त्यावर निम्ब उत्तरला, "देवा, माझ्या कड़े हिरव्या पानाची एवढी सम्पत्ती आहे, पण तिला वारस नाही. मला फूल, फळ पाहिजे."

यावर देव विचारात पडला. म्हणाला, "निम्बा, तुझ्या नशीबी मूल नाही." निम्ब म्हणाला, " देवा, तुम्ही विश्वाचे निर्माते, माझं नशीब बदलणे, तुम्हाला अशक्य नाही."
मग देव म्हणाला, " ठीक आहे. पण तुला त्यासाठी काहीतरी गमावाव लागेल. जर तुला फुलं आली, तर तुझ्या पानांचा सगला गोडवा तुला त्याना द्यावा लागेल. तुझी सगळी पानं कडू होतील. आहे कबूल?" "हो" निम्बाने तत्काळ उत्तर दिलं.
त्याच्या दुस-याच दिवशी त्याला छोट्या छोट्या कळ्या आल्या. जशा त्या उमलू लागल्या, तशा त्यांच्या चिमुकल्या चांदण्या झाल्या. त्यांचा गोड वास सगलीकडे पसरू लागला. त्या वासानी स्वतः निम्ब ही आनंदानी डोलू लागला. गावातले लोक ही फुलं बघून चकित झाले.

आता त्याच्यावर पिटुकल्या निम्बोण्याही येऊ लागल्या. पक्ष्यानी घरटी केली. झाड़ त्यांच्या कलरवाने धन्य होऊं किलबिलू लागले.

आता सारं काही निम्बाच्या मनाप्रमाणे झालं होतं. मात्र एकच गोष्ट त्याला सतावत होती: पूर्वी त्याची गोड पानं खायला पोरं- सोरं येत, आणि तृप्त होउन जात. आता मात्र ही पोरं अजिबात येईनाशी झाली.
मग त्यानी परत तप केलं. प्रसन्न झालेल्या देवाला त्यानी आपलं गा-हान सांगितल . त्यावर देव म्हणाला, तुझ्या पानाचा गोडवा तुला परत देण तर शक्य नाही. परन्तु तू पूर्वी केलेले उपकार लोक विसरणार नाहीत. तुझ्या खातरच्या प्रेमानी ते तुझी पानं वर्षाच्या सुरुवातीला न विसरता खातील. त्यानंतर दर गुढीपाडव्याला - म्हणजे वर्षाच्या सुरुवातीला निम्बाची पानं खाण्याची पद्धत आपल्याकडे सुरु झाली.मात्र त्याच्या कडवटपणानी त्याचं नाव "कडूनिम्ब" असं पडल , ते कायमचच !!!

- **आसावरी गुपचूप**

# खाऊचा डबा



स्वैपाक करायला खूप मजा येते हे माहित आहे तुम्हाला? आपण स्वतः बनवलेला पदार्थ तर नेहमी रुचकरच बनतो, असा माझा तरी अनुभव आहे. असे काही सोपे पदार्थ आपण करायला शिकू या का?

उन्हाळ्याच्या सुट्टीत दुपारी सारखी भूक लागायची. अर्थातच ती काही खरी भूक नव्हे...पण सारखे तोंडात टाकायला लागायचे. आणि मग काहीच मिळाले नाही, की आईचे डोके खायचे! तेव्हा मला या पदार्थाचा शोध लागला:

घरात चोकोलेट फ्लेवरचे बोर्नव्हिटा होते. त्यात भरपूर साय घातली. आणि साखर. मग ते छान घट्ट होईपर्यंत खूप वेळ घोटले. हा झाला चॉकलेट सॉस तयार. आता तो लावायचा मारी बिस्किटावर नाहीतर ब्रेड्वर. आणि झकासपैकी चॉकलेट सँडविच करून पुस्तक वाचत वाचत किंवा टी.व्ही. बघत बघत खात बसायचे.

बाल

# कवितेचा तास





गा रे सोन पाखरा, तू गा एक गाणे!
भिऊ नको अंधाराला, तुझी ही सावली रे
बघ कसे अंधारात चमकतात तारे.
गा रे धिटुकल्या गा तू एक गाणे!
भिऊ नको अंधाराला, खोल तुझे डोळे
बघ डोळ्यांमध्ये साचले भाव किती भोळे.

गा रे माझ्या चिमुकल्या, तू एक ज्योत रे
प्रकाशू दे सभोवताल तुझ्या अस्तित्वाने
बघ अंधार भेदण्याचा जतन करती काजवे.

गा सावळ्या कंठामधुनी, तू एक गीत रे
सूर सूर आळवत दंग मला होऊ दे
बघ किरकिर स्वरांचा ताल धरती रातकिडे.

गा रे माझ्या मना, तू गा एक गीत रे
अंधारात थांबत नसतो काळाचा खेळ रे
गा रे माझ्या मना, तू गा एक गीत रे.

स्वाती फडणीस.......................................१९९८

# मित्र

आई, तुला हे कधीच का समजत नाही?
मोठा होतोय मी आता!
तुझ्याएवढा बाबांएवढा नसेनसुद्धा,
पण माझ्याएवढा नक्की झालोय आता!

माझे विश्व, माझा कट्टा आणि माझे मित्र...
तुला मात्र अभ्यासच दिसतो दिवस रात्र.
मित्रांची नाती आणि नात्यांची कोवळीक
समजून नाही घेतली आत्ता, तर होईल मॊठी आगळीक



खातो थोडं जंकफूड
बिघडतं का एवढं?
तुझ्या हातच्या पोळी भाजीचंसुद्धा
मूल्य आहे मला तेवढं!
माझा मला ठरवू दे रस्ता नको करू मदत
चुकलेले निर्णय निभवण्याची येऊ दे माझ्यात हिंमत!

डोळ्यात का गं पाणी आई?
चुकलं का माझं?
पार पार विसरलीस का गं कुमारपण तुझं??
मोठी झालीस तरीसुद्धा करतेस दंगा मस्ती!
कालपर्यंत खेळत होतो की आपण दोघे कुस्ती
तू नाहीस मोठी
आणि मीही नाही आता लहान
तू मी आता मित्र!
मैत्रीच्या माझ्या ठेव मान!

- आसावरी

# चाफा

समज मी झालो एक चाफ्याचं फूल
सहज गमतीने,
फुललो त्या झाडाच्या उंच फांदीवर
हासत राहिलो वा-यावर
आणि नाचत राहिलो नव्या पानांवर
तर आई, तू मला ओळखशील का?

'बाळ कुठे आहेस?' तू हाक मारशील
मी उत्तर देणार नाही काहीच,
हासत बसेन फक्त स्वतःशीच,
मी हळूच उघडेन माझ्या पाकळ्या
आणि बघत राहीन तुझ्याकडे
तू काम करीत असताना

न्हाणीघरातून तू बाहेर पडशील
ओले केस खांद्यावरती पसरून
चाफ्याच्या सावलीतून
तू जाशील पलिकडच्या अंगणात
पूजा प्रार्थना करण्यासाठी
तेव्हा तुला येईल एका फुलाचा सुवास
पण तो माझा आहे
हे तुला कळणारच नाही

दुपारच्या जेवणानंतर
खिडकीजवळ बसून
तू रामायण वाचशील,
पडेल या झाडाची छाया
तुझ्या केसावर आणि मांडीवर,
तेव्हा मीही टाकीन माझी चिमुकली सावली
तुझ्या हातातील पुस्तकाच्या वाचत्या
पानावर,

पण तुला कळणारच नाही
की ही सावली तुझ्या
छोट्या बाळाची आहे

संध्याकाळ उलटल्यावर हातात दिवा घेऊन
तू गार्यींच्या गोठ्यात जायला निघशील
तेव्हा मी एक्दम जमीनीवर उडी घेईन

आणि पुन्हा होऊन तुझा चिमुकला बाळ,
तुला म्हणेन, 'आई, मला एखादी गोष्ट सांग'

तू विचारशील, 'लबाडा,
कुठे गेला होतास इतका वेळ?'
मी म्हणेन, 'मी तुला
सांगणारच नाही."

कवी- कुसुमाग्रज



कुसुमाग्रजांचे खरे नाव विष्णु वामन शिरवाडकर. (हे कवी लोक त्यांचे खरे नाव कळू नये म्हणून अशी नावे घेऊन कविता लिहित. कुसुमाग्रज, म्हणजे कुसुम या मुलीचा अग्रज म्हणजे मोठा भाऊ. म्हणजे, हे नाव हीसुद्धा त्यांची एक प्रकारची खरी ओळख होतीच!!)

कुसुमाग्रजांचा जन्म नाशिकचा. कविता, कथा, कादंब-या, ललित लेख असे अनेक साहित्यप्रकार त्यांनी अतिशय यशस्वीपणे हाताळले.

ही कविता आहे मुक्तछंदात. मुक्तछंद म्हणजे हिला यमक, ओळींची संख्या अशी बंधने नाहीत. आणि म्हणूनच कधी कधी मुक्तछंदातली कविता सरळ हृदयाला भिडते.

ही कविता एका मुलाने आईला उद्देशून म्हटली आहे. आता आपण एक गोष्ट नेहमीसाठीच लक्षात ठेवू या. ती म्हणजे, कोणतीही कविता, लेख जर संपूर्ण समजून घ्यायचे असेल, तर आपल्याला फक्त शब्दार्थच नाही, तर ते लेखन कधी झाले आहे, कुठे झाले आहे, ही पार्श्वभूमीही तितकीच महत्त्वाची आहे. ती समजून घेतली, की आपल्याला लेखकाच्या अनुभवांशी एकरूप होणे सोपे जाते.

अता ही कविता वाचली, की आपल्या डोळ्यासमोर उभे राहते ते मोठ्ठे घर. त्याला एक सुरेखसे अंगण, मागे परसदार, तिथे भरपूर फुलांनी, फळांनी सजलेला बगीचा आणि सगळ्यात महत्त्वाचे, म्हणजे दिवसभर घरात राहणारी आई! मला तर वाटते, ह्या कवितेतून कुसुमाग्रजांनी आई आणि मुलाएवढेच सुंदर त्या घराचे चित्र रेखलेले आहे! पाहा ना, त्या घराचे न्हाणीघर (म्हणजे बाथरूम, जी पूर्वी घराच्या बाहेर असे.), ती दोन अंगणे, एक बाहेरचे, आणि एक पूजा करण्याचे. म्हण्जे तिथेच एखादे तुळशीवृंदावनही असेल. दुपारचे ऊन तिथे विसावत असेल. आणि मग तो गायींचा गोठा... तिथे दिवा घेऊन जाणारी आई!

खरं सांगू का दोस्तांनो, हे असले घर, अशी आई मी काही पाहिलेले नाही. आपले आई-मुलाचे प्रेम तसेच असले, तरी संदर्भ मात्र बदलले आहेत. पण तरी, एखादी भूतकाळातील घटना बघावी, किंवा आपल्या आई-बाबांचे बालपण बघावे, असे वाटते की नाही ही कविता वाचल्यावर?

आणि आता हा संदर्भ लक्षात घेऊन ही कविता पुन्हा वाचा बरं! आता त्या आई आणि मुलाच्या नात्यामधली कोवळीक अजून स्पष्टपणे उभी राहते की नाही डोळ्यासमोर? तो बाहेर कुठेही खेळायला न जाता, लपून बसलेला, चाफ्याचं फूल झालेला, आईचं निरीक्षण करणारा मुलगा आता अजूनच गोड वाटतो की नाही? आणि आता अगदी खरं खरं सांगा, तुम्हालासुद्धा दिवसभर आई ऑफिसमध्ये काय काय करत असते, हे असेच लपून बघायची इच्छा होते की नाही?

हीच खरी गंमत आहे कवितेची....जी आपल्याला सगळ्यांनाच कधी ना कधी तरी वाटलेलेच असते, तेच कविता अजून सुंदरपणे सांगते आणि म्हणून ती आपल्याला आवडते.

हा कवितेचा तास आवडला का? पुढच्या वेळी पुन्हा भेटु या. नवीन कविता घेऊन. तोवर बाय बाय! टाटा!!

- **आसावरी गुपचूप**

## मधली सुट्टी

### सिंह आणि गाढव

एक गाढव सगळीकडे हैदोस माजवत असतो. तो उन्मत्त झालेला गाढव जंगलात पोहचतो. तरी त्याचा इतरांवर शिव्या शापांचा वर्षाव सुरू असतो. एके ठिकाणी जंगलाचा राजा सिंह छान ढाराढूर झोपलेला असतो. हा गाढव त्या राजालाही शिव्यांची लाखोली वाहतो. ते पाहून सिंह प्रचंड संतापतो. मोठी डरकाळी फ़ोडतो. मात्र गाढव काही शांत बसायला तयार नसते. मग सिंहाच्या लक्षात येतं की अरे हा शिव्या देणारा प्राणी तर 'गाढव' आहे. हे लक्षात येताच तो आपला संताप आवरतो आणि गुहेत जाऊन मस्त ताणून देतो. हे बघून गाढव आपल्या तोंडाचा पट्टा चालू ठेवून निघून जातो. मग सिंह त्याच्याकडे हळूच बघत मिश्किल हसतो.

**तात्पर्य** – सिंह हा राजा आहे. म्हणजे तो थोर आहे आणि जे थोर आहेत ते अशा क्षुद्र लोकांच्या निंदा नालस्तीकडे दुर्लक्ष करतात.

## चंद्राचा जन्म (अरुणाचली लोककथा)



ही अरुणाचल प्रदेश मधील एक लोककथा आहे. अरुणाचल प्रदेश हा अद्भुत प्रदेश आहे. तिथली जंगलं, तिथला निसर्ग, जितके रोमांचक आहेत, तितकेच तिथल्या आदिवासींच्या अद्भुत गोष्टीही! या सगळ्या गोष्टी त्यांनी आपापल्या आजी आजोबांकडून ऐकल्या, आणि आपल्या मुलांना सांगितल्या. आताआतापर्यंत ही प्रथा प्रचलित होती. मुळात तिथे करमणूकीची साधने जवळ जवळ नाही म्हटले तरी चालेल. प्रदेश इतका दुर्गम की एका गावाहून दुस-या गावी पोचेपर्यंत (पुणे मुंबई एवढेच अंतर असले, तरी) दिवसच्या दिवस जातात. त्यामुळे या मजेशीर, रंजक कथांनी त्यांची आयुष्ये सुखकर बनतात. सूर्य आणि चंद्र हे तेथील प्रमुख देव. त्यांना ते दोनी आणि पोलो म्हणतात. या दोनी-पोलोंबद्दल अनेक कथा प्रचलित आहेत. त्यातील सूर्य आणि चंद्र कसे बनले, याबद्दलची ही गंमतशीर कथा:

पूर्वी चंद्र नव्हताच. होते ते दोन सूर्य. ते दोन सूर्य जगाला प्रकाश आणि ऊब देत. त्यांच्या आईचे नाव लानबाई आणि वडिलांचे नाव एपायना.

त्या दोन सूर्यांमधला लहान भाऊ दुष्ट होता. एक दिवस तो त्याच्या मोठ्या भावाला म्हणाला, "आपल्याकडे एवढी शक्ती आहे, मग आपण गंमत म्हणून या पृथ्वीला जाळून टाकू या का?" पण मोठा भाऊ विवेकी, दयाळू होता. त्यानी त्याला सांगितले, की हे करणे चूक आहे.

पण लहान भाऊ कसला ऐकतो! मोठ्या भावाला तसेच सोडून तो निघून गेला आणि आभाळात जाऊन आग ओकू लागला. यामुळे झालं काय, गवत, झाडं सगळं काही जळू लागलं. झिकडे तिकडे वणवे लागले. शेतात काम करणारे शेतकरी उष्माघाताने मरू लागले. घरातसुद्धा लोक तळमळू लागले. प्राणी पक्षी आसरा आणि ्पाण्यासाठी सगळीकडे धुंडाळू लागले. पण जाणार कुठे? करणार काय?? नद्या, नाले, झरे, सारे सारे आटून गेले होते.

जेव्हा अरुणाचलच्या आदिवासींच्या देवाने म्हणजे अन्याने हे पाहिले, तेव्हा त्यानी आकाशाच्या देवाशी चर्चा केली आणि मोठ्या सूर्याच्या हे सारे कानावर घालायचे ठरवले. पण त्याच्या घराचा रस्ता कोणालाच माहित नव्हता. अन्या आदिवासींना म्हणाला, "मला तो रस्ता फार नाही माहित, पण जेवढा माहित आहे, तेवढा मी तुम्हाला सांगतो.:

पूर्वेच्या दिशेला दोन नद्या भेटतात. तिकडे जायचं. तिथून हा रस्ता लालिया या ठिकाणी जातो. तिथे न्यु आंजोरो हा देव राहतो. तिथून खूप पुढे गेले, की सूर्याच्या महालाचा रस्ता येतो."



अन्यानी मोठ्या सूर्यासाठी काही नजराणे न्यायला सांगितले. एक देव म्हणाला, "सूर्यासाठी आपण भाताची दारू (जिला इथले आदिवासी अपॉंग म्हणतात) नेऊ." मात्र अन्याला काही ते योग्य वाटले नाही.तो म्हणाला ,"आपण त्यांना देण्यासाठी दारू पिण्याचे बांबूपासून बनलेले भांडे देऊ.(तेव्हा पासून इदु मिश्मी हे अरुणाचली आदिवासी दारू बांबूच्या भांड्यातून पिऊ लागले असे मानतात.) शिवाय अन्याच्या सांगण्यावरून त्यांनी डुकरे, कोंबड्या आणि इतर पक्षीही नेले. (म्हणूनच सूर्याची पूजा करताना इदु मिश्मी लोक आजही डुकरे, कोंबड्या आणि पक्ष्यांचा बळी देतात.)

अन्याचे दूत मोठ्या सूर्याकडे आले आणि त्याला भेटीदाखल नजराणे दिले. मोठ्या सूर्याने ते स्वीकरले. परंतु त्याच्या लहान भावाच्या विध्वंसाचे वर्णन ऐकून मात्र तो भयंकर संतापला. आणि रागाच्या भरात त्याला उचलून चिखलात फेकून दिले.

त्या दिवसापसून मोठा भाऊ आकाशात असताना लहान भावाने तिकडे फिरकण्याची आजतागायत हिंमत केलेली नाही. मोठा भाऊ विश्रांतीसाठी घरी जातो, तेव्हाच तो आकाशात जातो. आणि चिखलात पडल्यामुळे तो पूर्वीइतका तेजस्वीही राहिलेला नाही. चिखलाचे डाग अजूनही त्याच्या चेह-यावर दिसतात.

# आभाळाखाली



मित्रांनो, हे सदर म्हणजे तुम्हाला एक दिलखुलास निमंत्रण आहे. घराच्या किंवा वर्गाच्या भिंतींमधून बिनभिंतींच्या उघड्या शाळेत येणाचं निमंत्रण. हिरव्यागार झाडाझुडुपांमध्ये, रखरखीत माळरानावर, तुम्ही खेळायला जाता त्या बागांमध्ये, डोलणा-या शेतामध्ये, अगदी तुमच्या बाल्कनीतदेखील आपल्या पंखवाल्या दोस्तांना शोधून काढायचं. त्यांच्या रंगीबेरंगी पिसांचं सौंदर्य डोळे भरून पाहण्याचं. त्यांच्या किलबिलाटाचा, चिवचिवाटाचा, त-हेत-हेच्या आवाजांचा अर्थ शोधून काढण्याचं. त्यांच्या चिमुकल्या घरकुलांची निरिक्षणं करण्याचं. निळ्या आकाशात उडतानाही त्यांना ओळखण्याचं. तर दोस्तहो, करा तयारी!

पक्षी पाहयचे, तर बरोबर हवी एक छानशी नोंदवही आणि पेन्सिल/पेन.पक्ष्यांची माहिती आणि चित्र असलेलं पुस्तक (फिल्ड गाईड) वेळेची नोंद ठेवण्यासाठी घड्याळ आणि ताजंतवानं उत्सुक असं मन!!!

मग गड्यांनो, तयार राहा! दर मासिकामध्ये मी घेऊन येणार आहे एका ओळखीच्याच पक्ष्याची माहिती. चला तर मग! भेटूच पुढच्या अंकात!!!

- किरण पुरंदरे (पक्षी निरीक्षक )

## नवे खेळ : चोरपोलीस

तुम्ही लोक चोरपोलीस खेळता की नाही? आज आपण डिटेक्टिव डिटेक्टिव खेळू या?? कसे खेळायचे माहित आहे? एक पदार्थ घ्यायचा. तो भेसळयुक्त आहे की नाही ते शोधून काढायचे. तर सुरु?

आधी दालचिनी. दालचिनीची पूड पाण्यात घाला आणि ढवळा. जर ती पाण्यात विरघळली, तर याचा अर्थ त्यात कॅशिया या वनस्पतीच्या सालीचा समावेश आहे. कॅशियाच्या सालींची चव आणि रंग दालचिनीशी मिळता जुळता असतो.

मिरी मध्ये जर त्यात पपईच्या बिया मिसळलेल्या असतील, तर त्या पाण्यात घातल्यावर पाण्याच्या वर तरंगतात.

हं आता लाल तिखटाची परीक्षा घेऊ. एक ग्लासभर पाणी घ्या. त्या पाण्याच्या वर लाल तिखट शिंपडा, जर पाणी लाल झाले आणि पाण्याच्या पृष्ठभागावर लाकडाच्या पूडेसारखा पदार्थ दिसला, तर .....चला चोराला पकडा!!!



## चित्राची चौकट

या चित्रातून सरळ रेषा आणि वक्र रेषांचा संघर्ष तसेच शीत रंगांचा, उष्ण रंगांशी संघर्ष दिसून येतो. तसेच विविध आकारांचं मिश्रण आणि त्यातही त्यांचं स्वतःचं अस्तित्व टिकवून ठेवणं विशेषच

चित्रकार - वसंत ढोबळे (वसंताजोबा)

# गंमत-ओळख

आपल्याकडे पूर्वी गावामध्ये बारा बलुतेदार असत. हे बलुतेदार हे शेतक-याला मदत करायला, गाव चालवायला मदत करीत. हे बलुतेदार म्हणजे १) चौगुले २)महार (पहारेकरी) ३) सुतार (लाकडाचे काम करणारा) ४)लोहार (लोखंडाचे काम करणारा ५) कुंभार (मातीची भांडी करणारा) ६) चांभार (जोडे बनवणारा) ७) न्हावी (केस कापणारा) ८) सोनार (दागिने घद्डवणारा) ९) जोशी (पत्रिका पाहून मुहूर्त काढणारा) १०) परिट (कपडे धुणारा ११) गुरव (पुजारी) १२) कोळी (पाणे , मासे आणणारा)

आपण या सगळ्या मंडळींचे सध्या काय सुरु आहे, हे पाहणार आहोत.प्रत्येक महिन्यात आपण एक एका बलुतेदाराची ओळख करून घेऊ.

## या महिन्यात बघू या चांभार:

**काका, तुमचे नाव काय?**
माझे नाव नारायण काशीनाथ कांबळे

**कुठे राहता?**
मी राहतो वनाज जवळ. लोकमान्य सोसायटी, पुणे

**तुमचे मूळ गाव कोणते?**
मी मूळ पुण्याचा नाही. माझे मूळ गाव बीड. इथे माझ्या लहानपणी आलो. माझ्या चुलतीने (काकीने) माझा सांभाळ केला. आई वडील तिकडे गावाकडे असतात. वडीलसुद्धा हाच धंदा करतात.

**इथे कधी पासून काम करता?**
मी इथे काम करतो दीड वर्षापासून. पण त्याआधी वनाजजवळ काम करत होतो.
हे काम तुम्हाला कोणी शिकवले?
हे काम मला माझ्या वडिलांनी शिकवले. अगदी वयाच्या सातव्या आठव्या वर्षापासून मी हे शिकलो. जसा मोठा होत गेलो, तसे अजून नवी नवी कामे मला दिली.

**हे काम कठीण आहे का हो?**

आता कठिण म्हणजे, तशी हाताला सवय झाली आहे. त्यामुळे कठिण वाटत नाही. पण म्हणजे जरा शिवताना हात चुकला, की हाताला लगते. चुका (खिळा) हातात बसतात...पण त्याची सवय झाली आहे आता!

**काय काय करावे लागते?**

म्हणजे आमचे हेच काम...जोडे शिवायचे, कधी चिकटवावे लागतात, कधी सोल बदलायचे असतात, चुका माराव्या लागतात. हेच काम!

**सध्या जोडे दुरुस्त करायला लोक येतात का?**

हो दुरुस्त करून घ्यायला येतात...पण नवीन जोडे कोणी बनवून घेत नाही. खरं तर हाताने बनवलेले जोडे जास्त टिकाऊ अस्तात. पण आता कोणी इथे जोडे बनवून घेत नाही. सगळे रेडिमेड दुकानातून घेतात. तिकडे गावाकडे घेतात काही लोक बनवून. पण इथे मात्र नाही.

**जोड्यांची दुकाने निघाली आहेत, त्याविषयी तुम्हाला काय वाटते?**

आम्हाला आता काही काम नसते. तिकडेसुद्धा आम्हाला जोडे बनवायला काम मिळत नाही. कंपनीची लोक असतात. त्यामुळे आम्ही फक्त लोकांचे फाटके जोडेच दुरुस्त करून देतो.

**तुमची मुले काय करतात?**

मला दोन मुले. एक मुलगी आणि एक मुलगा. मुलीचे नाव अर्चना आणि मुलाचे दत्ता. मुलगी शाळेत जाते. कॉर्पोरेशनच्या शाळेत तिला घातले आहे. मुलगा अजून लहान आहे.

**तुमच्या मुलांनी काय करावे असे तुम्हाला वाटते?**

आमच्या मुलांना मी शिकवणार. आम्हाला लिहिता वाचता येत नाही. त्यामुळे त्यांचा अभ्यास घेता येत नाही. मी इथे काम करतो, एके ठिकाणी झाडायचे काम करतो. असे करून सकाळी सहा ते रात्री सात काम असते. रात्री कोणती शाळा असेल तर मलापण शिकायला आवडेल. पण माझी मुले हेच काम नक्की करणार नाहीत.

# चला भटकायला



या सदरातून आपण राज्याची सफ़र करणार आहोत. डोंगर, द-या, झाडी, समुद्र किनारे, अभयारण्ये, घाट, धार्मिक स्थळे. त्यासाठी सर्वप्रथम आपल्याला आपल्या राज्याची माहीती नको का ? म्हणून या पहिल्या भागात आपल्या महाराष्ट्राविषयी

**स्थापना** – १ मे १९६०

**राजधानी** – मुंबई

**उपराजधानी** – नागपूर

**चतु:सीमा** -

पूर्व – छतीसगड

पश्चिम – अरबी समुद्र

दक्षिण – गोवा, कर्नाटक, आंध्रप्रदेश

उत्तर – दादरा व नगर हवेली, गुजरात, मध्यप्रदेश

**क्षेत्रफ़ळ –** ३,०७,७१३ चौ. किमी

**एकूण वनक्षेत्र –** ६४०७८ चौ किमी

**वन्यजीव सुरक्षित क्षेत्र –** १,५३,२१५ चौ किमी

**पूर्व पश्चिम लांबी –** ८०० किमी

**दक्षिणोत्तर लांबी –** ८०० किमी

**समुद्र किनारा –** ७२० किमी

**पर्वतरांगा –** सातपूडा व सह्याद्री

( उपरांगा – सातमाळा, अजिंठा, हरिश्चंद्र, बालाघाट, महादेवाचे डोंगर )

सर्वात उंच शिखर – कळसूबाई (उंची समुद्रसपाटी पासून १,६३६ मीटर)

**महत्वाचे घाट –** कोकणात जाण्यासाठी सह्याद्रीवरील थळ, माळशेज, बोर, वरंधा, कुंभार्ली, आंबा, फ़ोंडा व आंबोली तसेच पुणे-सातारा, कात्रज, खंबाटकी, पुणे-सासवड, दिवा घाट, औरंगाबाद-चाळिसगाव व औट्रम घाट

**प्रमुख नद्या –**

**तापी** ( उपनद्या – पांझरा, गिरणा, मोर्णा, पुर्णा, काटपूर्णा)

**वैनगंगा** ( उपनद्या – पंच, कन्हान, वर्धा, पैणगंगा )

**गोदावरी** ( उपनद्या – कादवा, प्रवरा, शिवना, सिंदफ़णा, मांजरा, पूर्णा, मन्याड, दुधना, प्राणहिता, इंद्रावती)

**भीमा** ( उपनद्या – कुकडी, घोड, भामा, नीरा, माण, सीना )

**कृष्णा** (उपनद्या – कोयना, वेण्णा, गायत्री, येरळा, वारणा, पंचगंगा, मलप्रभा, घटप्रभा)

**कोकणातील नद्या –** वैतरणा, तानसा, काळू, उल्हास, आंब, सावित्री, वशिष्टी, शुक, गड, शास्त्री, तेरेखोल

– **पीयुष नाशिककर**

वाचक मित्रांनो

हा आपला बालनेटाक्षरीचा पहिला इंटरनेट अंक. कसा वाटला ? जरूर कळवा. आपण हा अंक मेलद्वारे 40000 वाचकांना विनामूल्य पाठवतो. त्यांच्याकडून तो पुढे जात जात लाखभर लोक तो वाचतात. यात तुम्हीही जरूर लिहा. तुम्ही लिहावं म्हणून तर चालू केलय हे, गोष्टी लिहा, कविता लिहा, गाणी लिहा, तुमच्या गावाबद्दल लिहा, मित्रांबद्दल लिहा परदेशात असाल तर तिकडच्या मित्रांबद्दल लिहा, अजून काही गमती जमती येत असतील तर लिहा, आम्हाला माहीत आहे तुम्हीही शाळांना सुट्ट्या लागल्या की भरपूर भटकत असणार , मोबाईल ने फ़ोटो काढत असणार आम्हालाही पाठवा ना नविन ठिकाणांची माहीती आणि फ़ोटो .

तुमच्या मित्रांचे ई-मेल आयडी सुद्धा कळवा मग आम्ही त्यांनाही हा अंक पाठवू लवकरच दूसरा अंक घेऊन येत आहोत.

आमचा पत्ता आहे esahity@gmail.com